दि.०१.०१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या/ होणाऱ्या न्यायमूर्तींना निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतन, मृत्यू-नि-सेवानिवृत्ती उपदान व निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण सुधारित दराने अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**क्रमांक : एचसीटी-२५०९/८९०/(१४३)/का.चार**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ०९ मार्च, २०१०.**

**संदर्भ** : (१) भारत सरकार, कार्मिक लोकतक्रारी तथा निवृत्तीवेतन मंत्रालय यांचे ज्ञापन क्रमांक : F-38/37/08- P&PW(A), दि.०२.०९.२००८.
(२) भारत सरकार, विधि व न्याय मंत्रालय यांचे पत्र क्रमांक : L-11016/2/2009-JUS, दि.१२.०५.२००९.

**प्रस्तावना** : सहाव्या वेतनआयोगाच्या शिफारशींच्या अनुषगाने संदर्भ क्र.१ वरील ज्ञापनान्वये दि.०१.०१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या/होणाऱ्या केंद्र शासनाच्या सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचे निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतन, मृत्यू-नि-सेवानिवृत्ती उपदानाची मर्यादा व निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकरणाची मर्यादा सुधारित करण्यात आली आहे. त्याप्रमाणेच दि.०१.०१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या/ होणाऱ्या न्यायमूर्तींना निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतन, मृत्यू-नि-सेवानिवृत्ती उपदान व निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण सुधारित दराने अदा करण्याकरिताची कार्यपद्धती संदर्भ क्र.२ वरील पत्रान्वये विहित करण्यात आली आहे. यासंदर्भात पुढील प्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय** :- उच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती (वेतन व सेवाशर्ती) अधिनियम, १९५४ मधील परिशिष्ट-एक, भाग-३ मधील दि.०१.०१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या/ होणाऱ्या न्यायमूर्तींसाठी (राज्य शासनाच्या निवृत्तीवेतनार्ह सेवेतून उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्ती पदी नियुक्त झालेले) केंद्र शासनाच्या कार्मिक लोकतक्रारी तथा निवृत्तीवेतन मंत्रालय यांचे ज्ञापन क्रमांक : 38/37/08- P&PW(A), दि.०२.०९.२००८ हे लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच दि.०१.०१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या/ होणाऱ्या भाग-३ मधील न्यायमूर्तींकरिता मृत्यू-नि-सेवानिवृत्ती उपदानाची कमाल मर्यादा रु.१०,००,०००/- इतकी वाढविण्यात येत आहे.

(कृ.मा.प.)

३.  उच्च न्यायायलातील दि.०१.०१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या/होणाऱ्या सर्व न्यायमूर्तींना त्यांच्या निवृत्तीवेतनाच्या ५०% रकमेच्या मर्यादेपर्यंत अंशराशीकरण करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत असून सदर लाभ हा संदर्भ क्रमांक १ वरील ज्ञापनातील परि.९.२ ते ९.४ मधील तरतुदींनुसार अनुज्ञेय होईल.

३.  याप्रीत्यर्थचा खर्च हा न्यायमूर्तींचे सेवानिवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्तीवेतन ज्या लेखाशीर्षाखालील अनुदानातून खर्ची टाकले जाते, त्याच लेखाशीर्षांतर्गत मंजूर तरतुदीमधून अदा करण्यात यावा.

४.  सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.संदर्भ क्रमांक २७९/०९/सेवा-४, दि.०७.०१.२०१० अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

आर.बी.पटले

**(आर.बी.पटले)**
**सॉलिसिटर-नि-सह सचिव**

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई.
प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद/नागपूर.
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-एक, मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-दोन, नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/औरंगाबाद/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/नागपूर.
वित्त विभाग, सेवा-४, मंत्रालय, मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, का.२३/२४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (का.४).